**महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ** (Maharashtra State Infrastructure Development Corporation) **करीता अधीक्षक अभियंता यांचे १ पद निर्माण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.११२ (भाग-१)/नियो-१अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १० जून, २०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. संकीर्ण २०२२/प्र.क्र.१०७/नियो-१अ, दि.२२.०५.२०२३
२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.११२/नियो-१अ, दि.२३.०८.२०२३

**प्रस्तावना:-**

रस्ते, बंदरे, विमानतळ, रेल्वे, मेट्रो, वीज इत्यादी विविध २२ पायाभूत सुविधा विकास क्षेत्रातील प्रकल्प राबविणे व त्यासाठी विविध स्त्रोतांमार्फत निधी उभारणे या प्रयोजनासाठी सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळाची स्थापना शासन निर्णय दि.२२.०५.२०२३ अन्वये करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळाकरीता आवश्यक मनुष्यबळाची रचना वाचा १ मधील शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आली आहे. या महामंडळाकरिता सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच आवश्यकतेनुसार इतर विभागाकडील मनुष्यबळ प्रतिनियुक्तीव्दारे व आवश्यकता भासल्यास बाह्यस्त्रोताव्दारे उपलब्ध करावयाचे आहे. महामंडळावर प्रतिनियुक्ती/ बाह्यस्त्रोताव्दारे भरावयाच्या एकूण ४७ पदांना मान्यता प्राप्त आहे. सदर ४७ पदांमध्ये २ मुख्य अभियंता, १ अधीक्षक अभियंता ही ३ तांत्रिक पदे तर इतर ४४ अतांत्रिक पदांचा समावेश आहे. महामंडळाकडून सद्यस्थितीत प्रगतीत असणा-या विविध रस्ते व इमारतीच्या प्रकल्पाच्या गतीशील व प्रभावी अंमलबजावणीसाठी अनुभवी व तज्ञ अधिका-याची तात्काळ नियुक्ती करणे अत्यावश्यक आहे. त्यानुसार महामंडळावर " अधीक्षक अभियंता" या एका पदाची तात्पुरती निर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ (Maharashtra State Infrastructure Development Corporation) करीता भरावयाचे अधीक्षक अभियंता यांचे १ पद (S-२५; रु.७८८००-२०९२००) तात्पुरते निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त पदासाठी होणारा वेतनावरील खर्च हा महामंडळाला उपलब्ध होणा-या एजन्सी चार्जेस मधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०६१०११२५२१८७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PADMAKAR PRITHAM LAHANE

Digitally signed by PADMAKAR PRITHAM LAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=dbcf868246c1233be0da6495734843623d03ac22e47b5e3bfeca26d5118aa90d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=039C83D86A6AEF4AA81A48842237960565694DE4DE4C3B1C8E029C0A3BE9C70A, cn=PADMAKAR PRITHAM LAHANE
Date: 2024.06.10 11:38:54 +05'30'

**( पद्माकर लहाने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव
३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय,मुंबई
६) अ.मु.स.(वित्त) यांचे स्वीय सहाययक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अ.मु.स.(सा.बां.) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अ.मु.स.(नियोजन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मंत्रालयीन विभाग
१०) सचिव (रस्ते / बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग
१२) उप सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) उप सचिव (इमारती), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ
१५) कार्यासन क्र.व्यय -११/अर्थबळ, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती (नियोजन-१अ), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई